सन २०१९-२० या वर्षाकरिता "कै.वासुदेव गायतोंडे कला जीवन गौरव पुरस्कार" प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. एडीआर - २०२०/प्र.क्र. १/तांशि-६,**
मंत्रालय, विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ४ जानेवारी, २०२०.

**वाचा :** - १) कला संचालक यांचे पत्र क्रमांक डिओअे-२०१९/तीन/२१४६, दि. ३० डिसेंबर, २०१९.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०१९/प्र.क्र.९४/तांशि-६ दिनांक २ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याला कलेचा समृध्द वारसा लाभला आहे. दृश्यकलेचे शिक्षण देणारी भारतातील पहिली संस्था सर ज.जी. कला महाविद्यालयाच्या स्वरुपात, सन १८५७ या वर्षी मुंबई येथे स्थापन झाली. राज्यातील कलाकारांनी कला क्षेत्रात राष्ट्रीय तसेच, आंतरराष्ट्रीय स्तरावर लौकिक प्राप्त केला आहे.

दृश्य कलेच्या क्षेत्रात महत्वाचे योगदान देणाऱ्या नामवंत व जेष्ठ कलाकारांचा यथोचित सन्मान करण्यासाठी "कै. वासुदेव गायतोंडे कला जीवन गौरव पुरस्कार" प्रदान करण्याचा निर्णय, उपरोक्त "वाचा" येथील संदर्भ क्र. (२) च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार, सन २०१९-२० या वर्षाकरिता "कै. वासुदेव गायतोंडे कला जीवन गौरव पुरस्कार" प्रदान करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय** :-

सन २०१९-२० या वर्षाचा "कै. वासुदेव गायतोंडे कला जीवन गौरव पुरस्कार", **नामवंत चित्रकार पद्मभूषण श्री. अकबर पदमसी** यांना प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. या पुरस्काराचे स्वरुप रक्कम रु. ५.०० लक्ष, स्मृतीचिन्ह व सन्मानपत्र असे आहे.

सदर पुरस्कार प्रदान करण्याबाबत संचालक, कला संचालनालय, मुंबई यांनी पुढील कार्यवाही करावी.

०३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०४१३३९३०८७०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, cn=Satish Jagdeorao Tidke
Date: 2020.01.04 15:44:00 +05'30'

**( सतिश ज. तिडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. पद्मभूषण श्री. अकबर पदमसी, ८०२ विनायक अंगण, जुना प्रभादेवी रोड, बेंगॉल केमीकल्सच्या मागे, व्हीआयपी शोरुमच्या समोर, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५.
५. महालेखापाल, महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखापरीक्षा ), मुंबई/नागपूर
६. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवड नस्ती (तांशि-६)